**सहायक कक्ष अधिकारी सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षेत यापूर्वी उत्तीर्ण न झालेल्या उमेदवारांचे परिक्षेसाठीचे अर्ज मागविण्याबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः सेप्रप २०२४/प्र.क्र.४१/वि.भा.प.**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
तारीख: ३० मे, २०२५

**वाचा:-** समक्रमांकाचे दि. २७.१२.२०२४ रोजीचे परिपत्रक.

**शासन परिपत्रक -**

संदर्भ क्र. १ च्या परिपत्रकान्वये, सन २०२५ च्या सहायक कक्ष अधिकारी सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षेची प्रथम संधी असलेल्या सहायक कक्ष अधिकाऱ्यांचे (त्यांना विभागीय परीक्षेचे प्रशिक्षण देण्यात येत असल्यामुळे) परीक्षेसाठीचे अर्ज मागविण्यात आले होते. मात्र ज्यांची सदर विभागीय परीक्षेची प्रथम संधी झाली आहे अशा उमेदवारांचे अर्ज स्वतंत्ररीत्या मागविण्यात येतील असे संदर्भाधीन परीपत्रकान्वये कळविण्यात आले होते.

०२. त्यानुसार आता **सदर परिपत्रकाद्वारे सन २०२५ मधील सहायक कक्ष अधिकारी सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा ही ज्यांची प्रथम संधी नाही व जे यापूर्वीच्या परीक्षेत अद्यापही उत्तीर्ण झालेले नाहीत (यापूर्वीच्या परीक्षेत एक किंवा अनेक विषयात अनुत्तीर्ण झालेल्या अथवा यापूर्वीच्या परीक्षेला अनुपस्थित राहीलेल्या अथवा यापूर्वीच्या परीक्षेला अर्ज सादर न केलेल्या ) अशा सर्व उमेदवारांचे परीक्षेसाठीचे अर्ज सोबत जोडलेल्या विहीत नमुन्यात मागविण्यात येत आहेत. संबंधित उमेदवारांनी सदर अर्ज या विभागाकडे दिनांक २० जून, २०२५ पर्यंत त्यांच्या आस्थापनेमार्फत सादर करावेत.**

०३. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी सदर परिपत्रक संबंधित सहायक कक्ष अधिकारी यांना ( प्रतिनियुक्ती वर / रजेवर असलेल्या सहायक कक्ष अधिकारी यांच्या सह ) लेखी स्वरुपात निदर्शनास आणावे व त्यांची स्वाक्षरी घेऊन ते कागदपत्र आपल्या अभिलेखात जतन करून ठेवावेत.

०४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२५०५३०१६०८२१११०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SMITA PRASAD JOSHI


Digitally signed by SMITA PRASAD JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=d759e39e5163375d3782e5f6bef7edf6a25c72797123cdaa86acd09edf52baf1,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=28AA5752FA66D3A7FDEAFB1F4AB24CD90FD9D667A6880CB8CCECA18276150ACA, cn=SMITA PRASAD JOSHI
Date: 2025.05.30 16:09:24 +05'30'


**(स्मिता जोशी)**
**अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
(सहायक कक्ष अधिकारी (विधि) यांचेकरीता)
२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
(आयोगातील सहायक कक्ष अधिकारी यांचेकरीता)
३. सह/उप सचिव (आस्थापना), सर्व मंत्रालयीन विभाग
(मंत्रालयीन संवर्गातील सहायक कक्ष अधिकारी यांचेकरीता)
४. निवडनस्ती

**शासन परिपत्रक क्रमांकः सेप्रप २०२४/प्र.क्र.४१/वि.भा.प., दि. ३० मे, २०२५**
**सोबत जोडलेल्या अर्जाचा नमूना**

**सहायक कक्ष अधिकारी सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा २०२५ पूर्वीच्या परीक्षेत उत्तीर्ण न झालेल्या (यापूर्वीच्या परीक्षेत एक किंवा अनेक विषयात अनुत्तीर्ण झालेल्या अथवा यापूर्वीच्या परीक्षेला अनुपस्थित राहीलेल्या अथवा यापूर्वीच्या परीक्षेला अर्ज सादर न केलेल्या ) उमेदवारांनी भरावयाच्या अर्जाचा नमूना**

(१) अर्जदाराचे संपूर्ण नाव व मोबाईल क्रमांक

(२) विभागाचे नाव

(३) सहायक कक्ष अधिकारी म्हणून नियुक्ती झाल्याचा दिनांक

(४) यापूर्वीच्या परीक्षेत उमेदवार एकूण किंती पेपर मध्ये उत्तीर्ण झालेला आहे याबाबतची माहीती खालील रकान्यात भरावी व त्यासोबत परिक्षेच्या निकालाच्या आदेशाची प्रत जोडावी.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| वर्ष | | | | | |
| पेपर क्रमांक | | | | | |